गुन्हे प्रकटीकरण शाखा गु.नों.क्र.१७/२०१३ (फारूक नेकू प्रकरण) मधून उद्भवणा-या प्रकरणांमध्ये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.श्री. प्रकाश शेट्टी यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांकः एसपीपी- २०१४/प्र.क्र.३५९/पोल-१०
२ रा मजला, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ००५,
दिनांक : २० जून, २०१५

**संदर्भ** :- शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी- १०१४/ए.एस.१०९/डी-चौदा, दिनांक १२.१२.२०१४

**शासन निर्णय** :- गुन्हे प्रकटीकरण शाखा गु.नों.क्र.१७/२०१३ या गुन्हयामधून उद्धभवणा-या प्रकरणांचे कामकाज पहाण्यासाठी ॲड.श्री.प्रकाश शेट्टी यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक १२.१२.२०१४ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

२. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड. श्री. प्रकाश शेट्टी यांना प्रतिदिन परिणामकारक सुनावणीसाठी रु. १०,०००/- प्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, प्रस्तुत प्रकरणी त्यांना अपरिणामकारक सुनावणी फी, विचारविनिमय फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी अनुज्ञेय असणार नाही.

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उप आयुक्त दर्जाहून कमी नाही अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या

लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक. निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७/१५/व्यय-७, दिनांक ८.०१.२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०३१३३९१९८७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: CN = Arun Vishnupant Joshi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.06.20 12:13:54 +05'30'

(अ.वि.जोशी)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र १, मुंबई
३. पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई.
४. सह पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई.
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. विधी व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई
८. वित्त विभाग (व्यय-७) मंत्रालय, मुंबई.
९. ॲड.श्री.प्रकाश शेट्टी, ए/७०१, महावीर प्लॅटिनम, घाटकोपर मानखुर्द लिंक रोड, इंडीयन ऑईल नगर जवळ, छोडा नगर, चेंबरू, मुंबई-४०० ०३३.
१०. निवडनस्ती (पोल-१०).